**कोयना प्रकल्पांतर्गत ठाणे जिल्हयातील भिवंडी तालुक्यातील पुनर्वसित गावठाणांमधील नागरी सुविधा कामांना प्रशासकीय मान्यता प्रदान करणेबाबत...**

# महाराष्ट्र शासन

**महसूल व वन विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः पुनर्व-२०१८/२८७/प्र.क्र.६९/र-८**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,

मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.

तारीख: १९/११/२०१८

वाचा -

१) महसूल व वन विभाग शासन परिपत्रक क्र: आरपीए २००८/प्र.क्र.५५०/र-१, दि.१/८/२००९
२) महसूल व वन विभाग शासन परिपत्रक क्र: आरपीए ०१११/प्र.क्र.१८/र-१, दि.२८/३/२०११
३) वित्त विभाग शासन निर्णय क्र: विअप्र-१०.०८/प्र.क्र.७०/२००८/विनियम, दि.१५/५/२००९
४) महसूल व वन विभाग शासन निर्णय क्र: संकिर्ण २०११/प्र.क्र.८० (भाग-२)/र-८, दि. २५/०७/२०१३
५) वित्त विभाग शासन निर्णय क्र: विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम,भाग-२, दि. १७/०४/२०१५
६) महसूल व वन विभाग शासन निर्णय क्र: आरपीए-२०१५/प्र.क्र.२१४/र-१, दि. २३/०९/२०१५
७) सार्वजनिक बांधकाम विभाग शासन निर्णय क्र: विअसु-२०१५/प्र.क्र.२१८/इमारती-२, दि. १६/१२/२०१५
८) वित्त विभाग शासन निर्णय क्र: विअप्र-२०१५/प्र.क्र.२०/२०१५/विनियम, दि. १९/०१/२०१६
९) महसूल व वन विभाग शासन निर्णय क्र.अर्थसं-२०१२/२३२/प्र.क्र.१०६/र-८, दि. २८/१/२०१४
१०) महसूल व वन विभाग, शासन पत्र क्र. बैठक-२०१७/प्र.क्र.६२/र-८, दि. २८/०९/२०१७
११) उपआयुक्त (पुनर्वसन),कोंकण यांचे पत्र क्र:पुनर्वसन/कार्या-२/कोयना/२०१८,दि. १२/६/१८
१२) महसूल व वन विभाग, शासन पत्र क्र: पुनर्व-२०१८/२८७/प्र.क्र.६९/र-८, दि. २७/०७/२०१८
१३) उपआयुक्त(पुनर्वसन),कोंकण यांचे पत्र क्र:पुनर्वसन/कार्या-१/कोयना/२०१८,दि.२३/१०/१८

**प्रस्तावना -**

कोयना प्रकल्पामुळे बाधित प्रकल्पग्रस्तांच्या ठाणे व पालघर जिल्हयातील पुनर्वसित गावठाणांमधील नागरी सुविधा कामांच्या अनुषंगाने मा. अपर मुख्य सचिव (मुख्यमंत्री सचिवालय) यांच्या अध्यक्षतेखाली दि. १९/०९/२०१७ रोजी बैठक संपन्न झाली होती. सदर बैठकीचे इतिवृत्त संदर्भाधिन क्र. १० येथील पत्रान्वये निर्गमित करण्यात आले आहे. सदर बैठकीतील निर्देशानुसार कोयना प्रकल्पांतर्गत ठाणे जिल्हयातील भिवंडी तालुक्यातील पुनर्वसित गावांमधील नागरी सुविधा कामांची अंदाजपत्रके उपआयुक्त (पुनर्वसन), कोंकण यांनी सुधारित करुन संदर्भाधिन क्र. ११ येथील पत्रान्वये प्रशासकीय मान्यतेस्तव सादर केली होती. तथापि, अंदाजपत्रकांसमवेत विहीत प्रमाणपत्र सादर करण्यात आली नसल्याने, सदर बाबींची पुर्तता करणेबाबत कळविण्यात आल्यानूसार संदर्भ क्र. १३ येथील पत्रान्वये सुधारित प्रस्ताव प्रशासकीय मान्यतेस्तव सादर करण्यात आला आहे.

२. याबाबत शासन निर्णय वित्त विभाग क्र.विअप्र-१०.०८/प्र.क्र.७०/२००८/विनियम, दि.१५.५.२००९ अन्वये प्रदान व वित्तीय अधिकार नियम पुस्तिका, १९७८ मधील भाग पहिला, उपविभाग तीन अनुक्रमांक ४ परिच्छेद क्र.२७ (२)(अ) अनुसार योजनेला किंवा प्रस्तावाला प्रशासकीय (वित्तीय मंजुरी धरुन) मान्यता

देण्याबाबत प्रशासनिक विभागास असलेल्या अधिकारानुसार, सन १९७६ पूर्वीच्या प्रकल्पातील पुनर्वसित गावांना नागरी सुविधा पुरविणे या योजनेअंतर्गत नागरी सुविधा कामांच्या अंदाजपत्रकांना प्रशासकीय मान्यता देणेबाबत शासन निर्णय क्र. संकिर्ण २०११/प्र.क्र.८०(भाग-२)/र-८, दि.२५/०७/२०१३ निर्गमित करण्यात आला आहे.

तदनंतर संदर्भाधिन क्र.५ येथील शासन निर्णयान्वये वित्त विभागाने वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८, भाग-पहिला, उपविभाग-एक ते पाच अंतर्गत प्रदान करण्यात आलेल्या अधिकारांमध्ये सुधारणा केल्या असून, सदर सुधारणानुसार व वित्तीय अधिकार नियम पुस्तिका, १९७८ मधील भाग पहिला, उपविभाग तीन अनुक्रमांक ४ परिच्छेद क्र.२७ (२) (अ) अनुसार योजनेला किंवा प्रस्तावाला प्रशासकीय (वित्तीय मंजुरी धरुन) मान्यता देण्याबाबत प्रशासनिक विभागास असलेल्या अधिकारानुसार ठाणे जिल्हयातील भिवंडी तालुक्यातील प्रस्तावाधिन कामांची संदर्भाधिन क्र.९ येथील आदेशान्वये प्रदान मूळ प्रशासकीय मान्यता रद्द करण्याची, सदर प्रस्तावामध्ये नमूद नागरी सुविधा कामांना नव्याने प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

**शासन निर्णय-**

**त्यानुसार, कोयना प्रकल्पांतर्गत ठाणे जिल्हयातील भिवंडी तालुक्यातील सोबतच्या विवरणपत्रामध्ये नमूद कामांची दि. २८/०१/२०१४ रोजीच्या आदेशान्वये प्रदान मूळ प्रशासकीय मान्यता रद्द करण्यात येत असून, सोबतच्या विवरणपत्रामध्ये नमूद नागरी सुविधा कामांच्या एकूण रु. ७९,७०,२६७/- ( अक्षरी रूपये एकोणऐंशी लक्ष सत्तर हजार दोनशे सदुसष्ठ फक्त) रकमेच्या अंदाजपत्रकांस खालील अटींच्या अधीन राहून प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे.**

१) प्रस्तावात समाविष्ट असलेल्या कामांकरिता गौण खनिज स्वामित्वधनाची वसूली करण्याची जबाबदारी संबंधित कार्यन्वयीन यंत्रणेची राहील.

२) निर्धारित करण्यात आलेल्या भौतिक मानकांनुसार काम करुन घेण्याची जबाबदारी संबंधित कार्यकारी अभियंता यांची राहील.

३)प्रस्तावाधीन नागरी सुविधा कामांवर होणारा खर्च मंजूर अंदाजपत्रकापेक्षा/विहीत मर्यादेपेक्षा जास्त होणार नाही याची संबंधित कार्यकारी अभियंता यांनी दक्षता घ्यावी.

४) प्रस्तावाधीन नागरी सुविधा कामांसाठीच्या अंदाजपत्रकांत दर्शविलेली कामनिहाय रक्कम तांत्रिक व प्रशासकीय मान्यतेनुसार असावी. तांत्रिक व प्रशासकीय मान्यतेतील अटींचे विहीत कार्यपध्दतीनुसार पालन होईल, याची संबंधित अधीक्षक अभियंता व कार्यकारी अभियंता यांनी दक्षता घ्यावी.

५) संबंधित कार्यन्वयन अधिकारी यांनी महाराष्ट्र प्रकल्पबाधित व्यक्तीचे पुनर्वसन अधिनियम १९९९ मधील कलम (१८) अन्वये प्रस्तावाधीन नागरी सुविधा सर्व दृष्टीने पूर्ण झाल्यावर व त्याप्रमाणे जिल्हाधिकारी, ठाणे यांचेकडून प्रमाणपत्र घेतल्यानंतर संबंधित जिल्हापरिषदेकडे तातडीने हस्तांतरित कराव्यात.

६) प्रस्तावाधीन नागरी सुविधा कामांचा उचित दर्जा राखला जाईल, याची कार्यन्वयन यंत्रणेने दक्षता घ्यावी.

३. **निविदा प्रक्रिया व कार्यारंभ आदेश :-**

**अ)** कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग क्रठाणे ,१ . यांनी प्रस्तुत प्रशासकीय मान्यता आदेशातील अटी लक्षात घेऊन प्रस्तावाधीन नागरी सुविधा कामांची निविदा प्रक्रिया तात्काळ सुरु करावी.

**ब)** कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग क्रठाणे ,१ . यांनी प्रस्तावाधीन नागरी सुविधा कामांची निविदा प्रक्रिया पूर्ण झाल्यानंतर निविदा प्राप्त कामांसाठीचे कार्यारंभ आदेश देऊन नागरी सुविधा कामे तात्काळ सुरु करावीत.

४. कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग क्र. १, ठाणे यांनी वरील क्र. ३ नुसार सुरु करण्यात आलेल्या निविदा प्राप्त नागरी सुविधा कामांच्या प्रगतीचा अहवाल (Work Progress Report)/खर्चाच्या प्रगतीचा अहवाल ( Expenditure Progress Report) इ. सादर करुन कामाच्या प्रगतीनुसार व सन २०१८-२०१९ या चालू वित्तीय वर्षाच्या उर्वरित कालावधीत निविदा प्राप्त कामे पूर्ण करण्याच्या नियोजनानुसार " मागणी क्रमांक सी-१० ४७०१ मोठे व मध्यम पाटबंधारे प्रकल्पावरील भांडवली खर्च (००)(०३) इतर प्रकल्प ४७०१-एच-७२७ (कार्यक्रमावरील खर्च) (दत्तमत)" या लेखाशीर्षाखाली आवश्यक निधीची मागणी शासनास सादर केल्यानंतर सदर लेखाशीर्षातून निधी वितरीत करण्यात येईल.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८१११९१२२८०७४२१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Dayanand S Munjale

Digitally signed by Dayanand S Munjale
DN: CN = Dayanand S Munjale, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Revenue And Forest Department
Date: 2018.11.19 12:35:37 +05'30'

**(द.शं. मुंजाळे)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. विभागीय आयुक्त तथा मुख्य नियंत्रण अधिकारी (पुनर्वसन) कोंकण विभाग, नवी मुंबई
२. उप आयुक्त (पुनर्वसन), कोंकण
३. जिल्हाधिकारी तथा पुनर्वसन उपसंचालक ठाणे
४. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, ठाणे
५. अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, ठाणे
६. कार्यकारी अभियंता, ठाणे बांधकाम विभाग क्र. १, ठाणे
७. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र राज्य, मुंबई-१,नागपूर-२ (२ प्रतीत)
८. महालेखापाल (लेखा परीक्षा ) महाराष्ट्र राज्य, मुंबई-१, नागपूर-२ (२ प्रतीत)
९. जिल्हा कोषागार अधिकारी, ठाणे

१०.उपजिल्हाधिकारी (पुनर्वसन ) ठाणे
११.वित्त विभाग, कार्यासन व्यय-१०, अर्थसंकल्प-३, मंत्रालय, मुंबई-३२.
१२.नियोजन विभाग,कार्यासन १४७५, मंत्रालय, मुंबई ३२.
१३.महसूल व वन विभाग, कक्ष अधिकारी ब-१, पी.ए.सी.कार्यासन ,मंत्रालय, मुंबई ३२.
१४.निवडनस्ती कार्यासन र-८, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.

*****

**शासन निर्णय महसूल व वन विभाग क्र: पुनर्व-२०१८/२८७/प्र.क्र.६९/र-८, दि.१९/११/२०१८ सोबतचे विवरणपत्र**

**कोयना प्रकल्पांतर्गत ठाणे जिल्हयातील भिवंडी तालुक्यातील पुनर्वसित गावठाणांमधील प्रशासकीय मान्यता प्रदान नागरी सुविधा कामांचा तपशील**

| अ क्र | पुनर्वसित गाव | नागरी सुविधा कामाचे नाव | प्रशासकीय मान्यता रक्कम रुपये |
|---|---|---|---|
| १ | कुसापुर | अंतर्गत रस्ता तयार करणे | १६,९१,०७१/- |
| २ | चिरांबे | जोड रस्ता तयार करणे कि.मी ०/००० ते ०/६१५ | १९,९७,४२९/- |
| ३ | मोरणी | अंतर्गत रस्ता तयार करणे | २९,५४,१०९/- |
| ४ | लामज | सिमेंट कॉंक्रीट गटार तयार करणे | १३,२७,६५८/- |
| | | **एकूण** | **रु. ७९,७०,२६७/-** |

Dayanand S Munjale

Digitally signed by Dayanand S Munjale
DN: CN = Dayanand S Munjale, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Revenue And Forest Department
Date: 2018.11.19 12:35:59 +05'30'

**(द.शं. मुंजाळे)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**